**टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथील मुलां-मुलींचे वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांक: टिमवि-२०२३/प्र.क्र.८३/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा** :- १. विभागाचा समक्रमांकाचा दि.२७.०२.२०२४ रोजीचा शासन निर्णय.

२. सचिव, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे यांचे दि.२८.०२.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :- टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या विद्यापीठाची स्थापना सन १९२१ साली झाली आहे. सन १९८७ मध्ये भारत सरकारने या विद्यापीठाला अभिमत विद्यापीठाचा दर्जा दिला आहे. सद्यस्थितीत विद्यापीठात विविध अभ्यासक्रमांसाठी ३००० विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला आहे. सद्यस्थितीत विद्यापीठात कमी क्षमतेचे वसतिगृह असल्याने वाढत्या विद्यार्थ्यांच्या संख्येला सामावून घेणे अडचणीचे ठरत आहे. सबब, विद्यार्थ्यांची वाढती संख्या विचारात घेता, अधिक क्षमतेचे मुलां-मुलींचे वसतीगृह इमारत बांधकाम करण्यासाठी वाचा क्र.१ येथील दि.२७.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.३४५०.८० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन वसतीगृह इमारत बांधकामासाठी निधी देण्याची संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविल्यानुसार वसतीगृह इमारत बांधकामास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथील मुलां-मुलींचे वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रु.५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतकी तरतूद खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. **अटी व शर्ती :-**

१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.

३. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे

अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेला निधी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३४४/२०२४/व्यय-५, दि.१४.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२१५९४२८२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c66207630576336152194 4ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.15 22:08:45 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.कुलगुरु, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे
३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७. कुलसचिव, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे.

८. सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.
११.नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८/१२) मंत्रालय, मुंबई.
१३.उप सचिव, (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
१४.उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
१५.अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.